**मुख्य न्यायदंडाधिकारी, हिंगोली, जि.हिंगोली यांना "कार्यालय प्रमुख " व "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- डीडीओ २०२५/प्र.क्र.७९/का.१२**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांक :- २५ मार्च, २०२५.

वाचा :- १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. सीआरसी २०२२/प्र.क्र.३७/का-१२, दि.२७ सप्टेंबर,२०२४.
२) विधि व न्याय विभाग, शासन अधिसूचना क्र. सीआरसी २०२४/प्र.क्र.५१/का-१२, दि.१७ फेब्रुवारी, २०२५.
३) जिल्हा व सत्र न्यायालय, हिंगोली यांचे पत्र जा.क्र./वित्त/१३/२०२५, दि.२५.०२.२०२५

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये हिंगोली जिल्ह्यासाठी स्वतंत्र न्यायीक जिल्ह्याची निर्मिती करण्यात आली असून प्रमुख जिल्हा व सत्र न्यायालय, हिंगोली हे नव्याने स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन अ.क्र. २ येथील दि.१७.०२.२०२५ रोजीच्या शासन अधिसूचनेन्वये दि.२२.०२.२०२५ पासून मुख्य न्यायदंडाधिकारी, हिंगोली हे न्यायालय कार्यान्वित झाले आहे. संदर्भाधीन अ.क्र.३ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार मुख्य न्यायदंडाधिकारी, हिंगोली यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

मुख्य न्यायदंडाधिकारी, हिंगोली या न्यायालयासाठी मुख्य न्यायदंडाधिकारी, हिंगोली यांना " कार्यालय प्रमुख " तसेच, " आहरण व संवितरण अधिकारी " म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर न्यायालयातील सर्व प्रकारची देयके कोषागारात सादर करण्यासाठी त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबीपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका,१९७८, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उप विभाग, १ मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक

विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम१९६८ मधील नियम १५(३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mahahrashtra.gov.in या संकतेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२५१७३५३२२३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SHESHRAO AKHARE

Digitally signed by SUNIL SHESHRAO AKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=c55b6c504707142ddacf2e4222bba5fd769f8fabe09cfab3a389b22d9d2e954c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=864BAFED115354AB0BA4922472430458850E886F58FCE5E92AF39B897208763E, cn=SUNIL SHESHRAO AKHARE
Date: 2025.03.25 17:36:49 +05'30'

**( सुनिल आखरे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रबंधक (निरिक्षणे-१/२), मा.उच्च न्यायालय, मुंबई
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय, हिंगोली.
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४) मुख्य न्यायदंडाधिकारी, हिंगोली, जि.हिंगोली
५) जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
६) कक्ष अधिकारी,का.२३/२०, विधि व न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई.
७) कक्ष अधिकारी, कोषा(प्रशा-५/विनियम/व्यय-५) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
८) निवडनस्ती.